# इस्लाम एक अध्ययन

लेखिका

**डॉ. जमीला अली जाफरी**

भाषांतर

**प्रा. मुबारक हुसैन मनियार**

*।।परम दयाळू व परम कृपाळू अल्लाहच्या नावाने।।*

# प्रस्तावना

कोणत्याही क्षेत्रात अज्ञान शाप बनते. अल्पज्ञता त्याच्याहीपेक्षा अधिक घातक सिद्ध होते. तसे पाहिले तर धर्म एक दोषमुक्त विश्वास आहे. आत्मशांतीचा मार्ग आहे. परंतु या भूमीवर अज्ञानवश धर्मगत मतभेद पल्लवित होत असतात. त्यासंबंधीच्या विकृती संहाराचे कारण बनतात. लोकांना वस्तुस्थितीचे ज्ञान नसल्यामुळे धर्माच्या उद्देशाने प्रेरित होऊन बोलता बोलता उद्रेकात्मक भावनांच्या आहारी जातात. मानव समाजाला या परिणतीपासून मुक्ती देण्यासाठी असल्या वाङ्मयाची नितांत आवश्यकता आहे, जे योग्य दिशेचा बोध करून देऊ शकेल.

म्हणून इस्लाम धर्म आणि तत्त्वज्ञानाचे अभ्यासक व प्रेमींसाठी इस्लामची वास्तववादी ओळख सुलभरीत्या करून देण्याचे उद्दिष्ट दृष्टीसमोर ठेवून 'इस्लाम - एक अध्ययन' प्रस्तुत करीत आहोत. आशा आहे की ही पुस्तिका जिज्ञासू मंडळींना प्रसन्न करू शकेल.

**- जमीला अली ज़ाफ़री**
जी/१, अरविंद कॉलनी
काशी हिंदू विद्यापीठ, वाराणसी
१८ डिसेंबर १९८१.

# इस्लाम - रूपरेषा आणि सिद्धान्त

इसवी सनाच्या सातव्या शतकात एका अशा क्रांतिकारी आध्यात्मिक विचाराधारेच पुनराविष्कार झाला जी जगात इस्लामच्या नावाने परिचित झाली.[१] 'इस्लाम' अरबी भाषेचा शब्द आहे, ज्याचा अर्थ आहे शांतीत प्रवेश करणे. हा शब्द तह, खुशाली, आत्मसमर्पण, आज्ञापालन व विनम्रतेच्या संदर्भातसुद्धा प्रयुक्त होतो. इस्लाम- अर्थात तो धर्म ज्याच्याद्वारे मनुष्य शांतीप्राप्तीसाठी अल्लाहला शरण जातो आणि कुरआन व हदीसद्वारा निर्दिष्ट सिद्धान्तांच्या आधारे अन्य माणसांशी प्रेम व अहिंसेचा व्यवहार करतो.[२]

इस्लामच्या उदयापूर्वीचे युग क्रमबद्ध सामुग्रीच्या अभावामुळे अंधकारमय आहे. मुस्लिम इतिहासकारांनी या युगाला 'जमाना-ए-जाहिलियत' (अज्ञान युग[३]) म्हटले आहे. एक काळ असा होता की अरब संस्कृतीची गणना जगाच्या महान आणि उन्नत संस्कृतीत होत असे. तसे पाहिले तर इराण प्रगतीशील देश होता; परंतु अरबवासी इराणी लोकांना अजमी (मुके-वाचारहित) म्हणून संबोधित असत. यावरून अरबस्तानी लोकांच्या प्रगत संस्कृतीची कल्पना चांगल्या प्रकारे येऊ शकते. परंतु इस्लामच्या उदयासमयी अरबस्तानी लोक जीवनमार्गापासून दूर भटकले होते. चोहीकडे वर्गीय विषमता, अज्ञान, अनाचार, अशांती आणि अमानवी कृत्यांचे साम्राज्य पसरले होते. सुरा (दारू) आणि सुंदरीचा प्रयोग आणि गुलामगिरीची प्रथा समृद्धी व ऐश्वर्याची परिचायक कसोटी मानली जात असे. समाजात विवाहासारखे पवित्र बंधन उपेक्षित होते. अरब जीवनाच्या विषमतापूर्ण स्थितीचे चित्रण करताना अब-कुत्बीने लिहिले आहे, "आम्हा लोकांचे काम शत्रू आणि शेजाऱ्याशिवाय जर कोणी न सापडल्यास आपल्या भावावरच आक्रमण करणे होय.[४] या युद्धखोर, भटक्या अरब जातीचे जीवन अत्यंत असंगठित, अनियमित व आचारहीन बनले होते. हे लोक धर्म व तत्त्वज्ञानाच्या सूक्ष्मतेपासून अनभिज्ञ होते. धार्मिक आस्थेच्या नावावर त्यांच्यात मूर्तीपूजेचे प्रचलन होते.

---

१. कुरआनच्या प्रतिपादनानुसार इस्लाम तितकाच प्राचीन आहे जितका या पृथ्वीवर खुद्द मानव.

२. (Shorter Encyclopaedia of Islam - Page 176-178)

३. आर. ए. निकोलसन - लिटररी हिस्ट्री ऑफ द अरब्स. (केंब्रिज युनिव्हर्सिटी - पृ.२५)

४. रामलेंडाओ- इस्लाम ॲण्ड द अरब्स, पृ. १९७

अशा प्रकारे इस्लामपूर्वी अरबस्तानवासी जीवनाची कठोरता व अज्ञानाच्या कुरुपतेने घेरले जाऊन पूर्ण पतनोन्मुख अवस्थेत जीवन जगत होते. त्यांच्यात सभ्यता व संस्कृतीच्या नावाने असे काहीही उरले नव्हते की ज्याने जगाला त्याच्याकडे आकर्षित करावे.

अशा प्रतिकूल परिस्थितीत आदरणीय मुहम्मद (स.)[१] यांचा अरबस्तानातील कुरैश नामक एका प्रमुख वंशात १२ रबीउल अव्वल (सोमवार दिनांक ११ नोव्हेंबर ५६९ इ.) रोजी मक्केत जन्म झाला. आरंभापासूनच ते गंभीर, सदाचारी, एकांतप्रिय व उदात्तचित्त होते. जेव्हा त्यांचे वय चाळीस वर्षांचे झाले तेव्हा त्यांच्याकडे अल्लाहकडून देवदूतामार्फत 'वह्य' (ईश्वरी आदेश) पाठविली जाऊ लागली आणि त्यांच्यावर प्रेषितत्वाची जबाबदारी सोपविली गेली. फलस्वरूप ते अरब जातीला कल्याण-मार्गाकडे प्रेरित करण्याच्या कामात गुंतले. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी अल्लाहच्या आदेशानुसार लोकांना एक ईश्वरवादाचे शिक्षण दिले. त्यांना प्रशिक्षित करून आत्मशुद्धीचा मार्ग दाखविला आणि समाजाला निरर्थक रीती-रिवाजापासून मुक्त करून उच्चकोटीच्या नैतिक व्यवहार, संस्कृती, सामाजिकता व नवीन आर्थिक नियम सांगून सुसंगठित केले. पारिवारिक संगठनाचे नियम, विवाह-घटस्फोटाचे नियम, अनाथ व निर्बलांच्या अधिकारांचे रक्षण, वारसासंपत्तीची वाटणी, देवाण-घेवाण व्यवहारात सुधारणा, घरगुती भांडणे मिटविण्याच्या पद्धती, दारू पिण्यावर बंदी, व्याज, जुगार आणि सट्ट्याला आळा, शुद्धता व पावित्र्यासंबंधी कायदे ठरविले गेले, ज्यांच्या आधारे एका उच्चकोटीच्या संस्कृती व सभ्यतेचा पाया घातला गेला. इस्लामी आंदोलनाचे प्रमुख वैशिष्ट्य असे आहे की तो व्यक्ती व संघाच्या अविष्कार प्रक्रियेच्या प्रत्येक पैलूवर संपूर्ण लक्ष ठेवतो. तसेच त्याच्या अंतर्गत असा प्रयत्न केला जातो की लोकांनी अल्लाहच्या 'दीन'[२]चा संदेश घेऊन पुढे जावे. त्यांच्यात नैतिक बल, ईश्वरभय आणि उच्चकोटीच्या मानवी गुणांचा विकास व्हावा. वास्तविकत: इस्लाम अशी परिपूर्ण जीवनव्यवस्था आहे, ज्यात जीवनाच्या सर्वतोन्मुखी विकासाचा एक पूर्ण व पूर्वनिर्धारित कार्यक्रम आहे आणि जीवनासंबंधी सर्व प्रश्नांचे समाधानसुद्धा आहे. ही लक्षात ठेवण्याजोगी गोष्ट आहे की प्रेषित मुहम्मद (स.) यांनी त्या

---

१. अल्लाहने त्यांच्यावर व त्यांच्या स्वजनावर आपली कृपा व सुरक्षा पाठवावी.

२. 'दीन'चे अर्थ- (१) धर्म, (२) जीवनपद्धती, (३) जीवव्यवस्था, ते विधान ज्यावर मनुष्याचे विचार व कार्यपद्धती आधारित असावी.

अरबस्तानवासियांना, ज्यांना संस्कृती, नैतिकता आणि ज्ञानाच्या क्षेत्रात कोणतेही स्थान नव्हते, सभ्य आणि ज्ञानाचे प्रेमी बनविले आणि जग विश्वबंधुत्वाच्या सिद्धान्ताने परिचित झाले. हे कार्य कुरआनच्या शिकवणीच्या माध्यमाने केले गेले.

पवित्र कुरआन मानवजातीसाठी अल्लाहकडून एक सर्वनिष्ठ आध्यात्मिक उपलब्धी आहे. हा एक असा महान क्रांतिकारी ग्रंथ आहे ज्यात अत्यंत व्यापक, सार्वकालिक व व्यावहारिक सिद्धान्तांचे संकलन आहे. हा २३ वर्षांच्या मुदतीत आयती व सूरतींच्या (परिच्छेद) रूपात विविध प्रसंगी अवतरित झाला, ज्यांना पाठांतराव्यतिरिक्त खजुरींची पाने, हाडे व पातळ कातड्यावर लिहून सुरक्षित ठेवले गेले. माननीय अबू बक्र (रजि.) यांच्याद्वारे संग्रहित केले गेले. यात लहान-मोठ्या ११४ सूरती आहेत. या ग्रंथात साहित्य, शब्दांचा मधुर विन्यास, लयबद्ध स्वरप्रवाहाबरोबर विचारांची सखोलता व ज्ञानाची व्यापकता विद्यमान आहे.

कुरआनमध्ये तौहीद (एकेश्वरवाद) अल्लाहचे गुण, आखिरत (परलोक), रिसालत (आदरणीय मुहम्मद (स.) प्रेषित असल्याबद्दल विश्वास ठेवणे, अल्लाहचे भय, धैर्य वगैरेंचा उल्लेख आहे. याच्या विवेचनात कमालीची अनुकूलता व तार्किक समन्वय आढळतो. याच्या दृष्टीने मानवजातीच्या मार्गभ्रष्ट होण्याचे मूळ कारण, मनुष्याचे आधाररहित तर्कावर अवलंबून राहणे, त्यांचे अज्ञान, हट्टीपणा व पक्षपात आहे.[१] वास्तवित: कुरआनवर विश्वास ठेवणाऱ्यांच्या जीवनाची सार्थकता यात आहे की मानवजातीने प्रेषितांच्या जीवन-चरित्राचा अभ्यास करावा; कारण त्यांची कोणतीही गोष्ट काल्पनिक अथवा अनुमानावर आधारित नव्हती. ते ज्या कोणत्या गोष्टी सांगत असत, त्या अल्लाहकडून असल्यामुळे विश्वसनीय होत्या. कुरआनमध्ये विभिन्न ठिकाणी

---

१. "आणि यांच्यापैकी काही तर यावर 'ईमान' (विश्वास) आणतील आणि यांच्यापैकी काहीजण ईमान आणणार नाहीत आणि तुझा रब (पालनकर्ता) बिघाड उत्पन्न करणाऱ्यांना चांगल्या प्रकारे जाणतो." - १०:सूरह यूनुस-४०

"जेव्हा की त्याच्यासाठी लिहिले गेले आहे की जो कोणी त्याच्याशी मित्रतेचे संबंध जोडील त्याला तो निश्चितपणे मार्गभ्रष्ट केल्याशिवाय राहणार नाही आणि त्याला धगधगत्या अग्नीच्या यातनेचा मार्ग दाखवील." - २२:सूरह अल हज्ज-४

"आणि लोकांपैकी कोणी असा आहे का जो एखाद्या ज्ञान व मार्गदर्शन आणि प्रकाशमान 'ग्रंथा'विना अल्लाहसंबंधी भांडतो." - २२:सूरह अल हज्ज-८

विश्वासंबंधी सूक्ष्म संकेतांना व्यवस्थित क्रमवार प्रस्तुत करून वास्तविकतेचे उद्घाटन केले गेले आहे.[१] याच्याव्यतिरिक्त जीवन तरी काय आहे? त्याचा उद्देश काय आहे? जन्म-मृत्यूसंबंधी विवेचन, जीवन यशस्वी बनविण्याचे नियम व सिद्धान्त, पाप-पुण्याचा हिशेब, ज्ञान-कर्माच्या गोष्टी वगैरेंची विस्तारपूर्वक चर्चा केली गेली आहे. कुरआनच्या शिकवणी अत्यंत स्पष्ट आणि व्यापक आहेत, ज्या सत्याची अभिव्यक्ती करून माणसासमोर एक उच्च व संतुलित जीवनपद्धती प्रस्तुत करतात. यांच्या अंतर्गत संपूर्ण जीवन-व्यापार येतो. यात इस्लामच्या ज्या स्वरूपाचे चित्रण व चर्चा केली आहे. त्याचा मूलाधार आहे- तौहीद (एकेश्वरवाद), बंधुभाव, भौतिक व्यावहारिकता व आध्यात्मिकता.

एकेश्वरवाद विश्वास व आस्थेचे सर्वोच्च शिखर आहे. इस्लामची ईश्वरविषयक धारणा अत्यंत विस्तृत आहे. याची आध्यात्मिकता छिद्रान्वेषण व गुंतागुंतीपासून मुक्त आहे. हेच कारण आहे की इस्लाममध्ये ईश्वराचे स्वरूप संदिग्ध नसून अत्यंत स्पष्ट आहे. कुरआनमध्ये ईश्वराच्या विराट सत्तेचे विशद वर्णन केले गेले आहे.[२] तो संपूर्ण विश्वाचा स्वामी[३], सृष्टा[४] आणि शासक[५] आहे. त्याला

---

१. "तोच आहे ज्याने सूर्याला प्रकाशमान केले आणि चंद्राला प्रकाशमान बनविले आणि चंद्राच्या (घट आणि वाढीचे) टप्पे ठरविळे जेणेकरून तुम्ही वर्षाची गणना करावी व हिशेब समजून घ्यावा. अल्लाहने हे सर्वकाही उद्देशासह निर्माण केले आहे. तो आपल्या आयती (कुरआनातील वाक्ये) स्पष्ट करून सांगतो, त्या लोकांसाठी जे जाणकार आहेत." -१०:सूरह यूनुस-५

"तो अल्लाह आहे, ज्याने आकाशांना विनाआधार उंच केले जसे की तुम्ही त्यांना पाहता, मग तो राजसिंहासनावर विराजमान झाला आणि त्याने सूर्य व चंद्राला कामावर लावले. प्रत्येक वस्तू एका ठराविक वेळेसाठी चालत आहे. तोच या कामाची व्यवस्था चालवितो कदाचित जेणेकरून तुम्ही आपल्या पालनकर्त्याशी भेटणार आहात याचा विश्वास करावा." -१३:सूरह अर-रअद-२

२. "म्हणा, मी आश्रय घेतो लोकांच्या पालनकर्त्याची, लोकांच्या सम्राटाची, लोकांच्या इलाह (आराध्य, पूज्य) ची." -११४:सूरह अन नास-१,२,३

३. "काय तुम्हाला माहीत नाही की तो अल्लाहच आहे, ज्याच्यासाठी आकाश व पृथ्वीचे राज्य आहे? तोच ज्याला हवे त्याला यातना देतो आणि हवे त्याला क्षमा करतो. अल्लाहला प्रत्येक बाबीवर सामर्थ्य प्राप्त आहे." -५:सूरह अल माइदा-४०

४. "तो अल्लाह आहे परिरूपक, अस्तित्व प्रदान करणारा, रूपकार, त्याच्यासाठीच सर्व चांगली नावे आहेत. ज्या ज्या वस्तू आकाशात व पृथ्वीत आहेत, त्या त्याचे गुणगान करतात आणि तो प्रभुत्वसंपन्न व तत्त्वदर्शी आहे."

५. "तो अल्लाह आहे, ज्याच्याशिवाय अन्य कोणीही 'इलाह' (पूज्य) नाही, सर्वशासक आहे, अत्यंत गुणवान, शांति स्वरूप, शरणदाता, संरक्षक, प्रभुत्वशाली, अत्यंत महान आहे. अल्लाहच्या महिमेच्या प्रतिकूल आहे तो अनेकेश्वरवाद जो हे लोक करतात." - अल हश्र-२३

सोडून इतर कोणीही या जगात पूजनीय नाही.[१] तो सर्वोत्तम संरक्षक, मित्र व मदतनीस आहे.[२] तो अत्यंत कृपाळू व दयाळू आहे[३] आणि कठोर शिक्षा करणारासुद्धा.[४] कुरआनमध्ये दाखविलेल्या मार्गाचे अनुसरण करून एकेश्वरवादावर विश्वास ठेवणे प्रत्येक मुस्लिमाचे कर्तव्य होय; ही एक प्रकारे दास्यभक्तीच आहे ज्यात दास स्वत:ला अल्लाहसमोर समर्पित करतो. इस्लाममध्ये एकेश्वरवाद सोडून अन्य कोणत्याही ईश्वरी भावनेला कोणतेही स्थान नाही.

इस्लाममध्ये प्रतिपादित विश्वबंधुत्वाची भावना त्याचे सर्वांत मोठे आकर्षण होय. याच्याद्वारे वर्गगत विषमता संपुष्टात येते आणि परस्पर प्रेम, मैत्री व औदार्यासारख्या सद्‌भावनांचा पाया पक्का होतो. सर्व मुस्लिम आपापसात भाऊ-भाऊ आहेत.[५] आदरणीय मुहम्मद (स.) यांनी आपल्या अंतिम हजयात्रेच्या वेळी व स्वर्गवास जवळ आला असता अरफातच्या मैदानात उपदेश देताना

---

१. "आता जर हे विमुख झाले तर सांगा- अल्लाह माझ्यासाठी पुरेसार आहे. त्याच्याशिवाय अन्य कोणी पूजनीय नाही. त्याच्यावरच मी विश्वास केला आणि तोच महान राजसिंहासनाचा स्वामी आहे." -९:सूरह अत तौबा-१२९

२. "आणि 'जिहाद' (जिवाची तमा न बाळगता प्रयत्न) करा, अल्लाहच्या (मार्गात) खऱ्या अर्थाने जिहाद. त्याने तुमची निवड केली आहे- आणि 'दीन' (धर्म) मध्ये तुमच्यासाठी कोणतीही उणीव ठेवलेली नाही, तुमचे वडील इब्राहीमचा पंथ (तुमचा पंथ आहे) त्याने तुमचे नाव मुस्लिम ठेवले होते. अगोदरसुद्धा आणि त्याच्यातसुद्धा- जेणेकरून 'रसूल' (प्रेषित) नी तुमच्यावर साक्षीदार व्हावे आणि तुम्ही लोकांवर साक्षीदार व्हावे म्हणून नमाज नित्य-कर्म बनवा आणि जकात (दानधर्म) अदा करा व अल्लाह (चा आधार) दृढतेने धरा. तोच तुमचा स्वामी व संरक्षक मित्र आहे. तो किती चांगला संरक्षक व किती चांगला सहाय्यक आहे." -२२:सूरह अल हज्ज-७८

३. "आणि जेव्हा तुमच्यापाशी ते लोक येतील जे आमच्या आयतीवर (कुरआनची वाक्ये) ईमान (विश्वास) आणतात तेव्हा म्हणा- तुम्हाला शांती व सुरक्षा प्राप्त होवो. तुमच्या पालनकर्त्याने दयाळूपणा आपल्यासाठी आवश्यक बनविला आहे की तुमच्यापैकी जो कोणी अज्ञानामुळे एखादे वाईट कृत्य करील व नंतर पश्चात्ताप करील आणि स्वत:मध्ये सुधारणा करील तर नि:संशय अल्लाह मोठा क्षमाशील व दयाळू आहे." -६:सूरह अल अनआम-५४

४. "आणि हे लोक कल्याणाअगोदर तुमच्याकडे अकल्याणासाठी घाई करीत आहेत. खरे पाहता यांच्यावर अगोदर किती यातना येऊन गेल्या आहेत. परंतु तुझा पालनकर्ता कठोर शिक्षा देणारासुद्धा आहे." -१३:सूरह अर रअद-६

५. "आणि सर्वांनी मिळून अल्लाहची दोरी मजबूत धरा आणि फुटीरपणाला वाव देऊ नका व अल्लाहच्या त्या कृपेचे स्मरण करा जी त्याने तुम्हाला केली आहे. तुम्ही एकमेकाचे शत्रू होता, तेव्हा त्याने तुमच्या हृदयांना एकमेकाशी जोडले आणि त्याच्या कृपेने भाऊ-भाऊ झालात व तुम्ही अग्नीच्या एका खड्ड्याच्या अगदी कडेवर उभे होता- अल्लाह तुमच्यासाठी आपली वचने (आयती) स्पष्ट करतो जेणेकरून तुम्हाला मार्ग सापडावा." -३:सूरह आले इमरान-१०३

भ्रातृभावनेवर विशेष भर दिला होता- जो हदीसमध्ये संकलित आहे.[१]

एकेश्वरवादावर विश्वास करणारा प्रत्येक मुस्लिम धर्मबंधु असतो. यात लपलेली ईश्वरी शक्ती सर्वांना एकतेच्या सूत्रात बांधते. याच बंधुत्वाच्या भावनेने अनुप्रणित झाल्यामुळे इस्लामचा धार्मिक, सामाजिक व राजनीतिक पक्ष अत्यंत सशक्त व प्रभावी राहिला आणि आपल्या अविर्भावानंतर काही वर्षांतच आशिया, आफ्रिका आणि यूरोपच्या अधिकांश भागावर आच्छादित झाला. इस्लाममध्ये जगाची व्यावहारिकता पूर्णपणे विद्यमान आहे. तो वैराग्य वा लौकिक सुखांचा त्याग करण्यास निषिद्ध ठरवितो. पौर्वात्य आशियातील सर्व धर्मांमध्ये इस्लाम एकमात्र असा धर्म आहे जो जगातील व्यवहारांना जवळचा व वैराग्यापासून फार दूरवर आहे.[२] खुद्द ईश्वराने आपल्या सेवकांकरिता या जगात सुखसोयीची साधने एकत्रित केली आहेत.[३] त्यांना अनेक प्रकारच्या देणग्या देऊन[४] सन्मानित व प्रतिष्ठित केले,[५] हरम (शांतिगृह) बनविले[६] आणि मनुष्याला सुंदरतम रूपात निर्माण केले.[७]

इस्लामच्या लोकप्रियतेत त्याच्या धार्मिक नेतृत्वाचा फार मोठा वाटा आहे. यावरून ज्ञात होते की आदरणीय मुहम्मद (स.) आणि त्यांचे उत्तराधिकारी किती महान व्यक्ती होत्या. आरंभिक काळात जे चार खलीफा होऊन गेले, त्यांनी साधेपणा, उत्तम चारित्र्य, शौर्य व त्यागाचे असे उत्तम उदाहरण प्रस्तुत केले की त्यामुळे इस्लामचा आचारपक्ष फारच उंचावला आणि इस्लाममध्ये त्या लोकांची संख्या वाढू लागली जे गृहस्थ (संसार करणारे) राहूनसुद्धा वैराग्याचे

---

१. कुरआन मजीद- भूमिका- मक्तबा अल-हसना, रामपूर, पृ. ४२.

२. ए. ए. आर. गिब्स- मोहम्मडनिज्म - पृ. १०३.

३. "आणि तुम्हाला ते सर्व काही दिले जे तुम्ही त्याला मागितले, जर तुम्ही अल्लाहच्या देणग्यांची गणना करू इच्छितो तर तुम्ही त्या पूर्णपणे मोजू शकत नाही. -१४:सूरह इब्राहीम-३४

४. "तुमच्यापाशी ज्या देणग्या आहेत त्या अल्लाहकडूनच होत." -१६:सूरह अन नहल-५३

५. "आणि आम्ही आदमच्या संततीला श्रेष्ठत्व प्रदान केले आणि तिला भूमि व समुद्रात वाहन दिले, पवित्र पदार्थांची रोजी दिली आणि तिला अशा बहुतेकापेक्षा श्रेष्ठत्व दिले ज्यांना आम्ही निर्माण केले आहे." -१७:सूरह बनी इसराईल-७०

६. "काय यांनी पाहिले नाही की आम्ही एक शांतिपूर्ण हरम बनविले आहे. वास्तविकत: यांच्यासभोवतालचे लोक हिसकावून घेतले जातात, तर मग हे असत्य गोष्टी मानतात व अल्लाहच्या देणग्यांशी कृतघ्नता करतात." -२९:सूरह अल अनकबूत-६७

७. "निश्चितच आम्ही माणसाला चांगल्यात चांगल्या स्वभावाचा बनविले."-९५:सूरह अततीन-४

पालन करू शकत होते, ज्यांना सिंहासन प्राप्त होऊनसुद्धा ते स्वभावाने फकीरासमान राहू शकत होते आणि हातात तलवार घेऊनसुद्धा दयेची कास सोडीत नसत.[१] इस्लामच्या या भौतिक व व्यावहारिक स्वरूपाने मानवसमाजाच्या त्या वर्गाला आपल्याकडे आकर्षित केले जो धर्म, जात व वर्गगत विषमतेच्या जात्यात भरडला जात होता. कुरआनमध्ये मानव जीवनासंबंधीच्या प्रत्येक समस्येचे व्यावहारिक समाधान आहे. भौतिक जीवनाशी निगडीत राहून आदरणीय मुहम्मद (स.) यांनी दाखविलेल्या मार्गावर चालून एकेश्वरवादावर आधारित विश्वासाचे रक्षण करणे प्रत्येक मुस्लिमाचे परमकर्तव्य होय.

इस्लाम भौतिक व्यावहारिकतेच्या पक्षधर असूनसुद्धा व्यक्तीच्या आध्यात्मिक विकासावर विशेष भर देतो. भौतिक बंधनात व्यक्ती जखडलेली असूनसुद्धा तिच्यात प्रत्येक क्षणी ईश्वराचे भय व कर्तव्य-अकर्तव्याचा विचार सामावलेला राहतो. नमाज, रोजा (उपवास), जकात (दानधर्म) आणि हज्ज हे इस्लामच्या आध्यात्मिक साधनेचे महत्त्वपूर्ण आधार होत. नमाज ठराविक वेळी नामस्मरण करण्याचे साधन होय, ज्याच्याद्वारे व्यक्ती दिवसातून पाच वेळा अल्लाहसमोर उपस्थित होते. ही नमाज जीवाच्या साफल्याचा मूळ आधार होय.[२] 'रोजा' (उपवास) एक प्रकारची तपश्चर्या होय, जी आत्म्याला परिष्कृत करते. 'रोजा' कुरआनसारख्या महत्त्वपूर्ण देणगीसाठी अल्लाहचे आभार मानण्याची एक पद्धत होय.[३] 'जकात' भोग-विलासाला मर्यादा घालण्याची पद्धत होय, यामुळे मनुष्य दुराचारापासून अलिप्त राहतो.[४] हे हृदयशुद्धीचे एक साधन

---

१. रामधारीसिंह 'दिनकर'- संस्कृतीचे चार अध्याय - पृ. २२८.

२. "त्याने सफलता प्राप्त केली ज्याने स्वत: शुद्धता अंगिकारिली आणि आपल्या पालनकर्त्याचे नामस्मरण केले. मग नमाज अदा केली." -८७:सूरह अल आला-१४-१५

३. 'रमजानचा महिना आहे ज्यात कुरआन उतरविले गेले लोकांचे मार्गदर्शन म्हणून आणि मार्गदर्शन व सत्य-असत्यातील अंतर स्पष्ट प्रमाणानिशी. मग जो कोणी तुमच्यापैकी या महिन्यात असेल त्याच्यासाठी आवश्यक आहे की त्याने 'रोजे' ठेवावेत आणि जो आजारी अथवा प्रवासात असेल त्याने इतर दिवसांत ती संख्या पूर्ण करावी. तो तुमच्यावर सक्ती करू इच्छित नाही. तुम्ही अल्लाहच्या मोठेपणाचे गुणगान करा ते अशासाठी की त्याने तुमच्यासाठी मार्ग खुला केला आहे, जेणेकरून तुम्ही कृतज्ञ व्हावे." -२:सूरह अल बकरा-१८५

४. "आणि जर तुम्ही उघडपणे 'सदका' (दान-धर्म) दिला तर हीसुद्धा चांगली गोष्ट आहे आणि जर लपवून गरिबांना दिले तर हे तुमच्यासाठी अधिक चांगले आहे आणि तो तमच्या अनेक वाईट गोष्टींना दूर करील व अल्लाहला जे काही तुम्ही करता त्याची खबर असते." -२:सूरह अल बकरा-२७१

होय.[१] हज धार्मिक सतर्कतेचा व कर्तव्यपरायणतेचा परिणाम आहे. जो काबाची यात्रा करू शकतो त्याने हज करणे अनिवार्य आहे.[२]

आदरणीय मुहम्मद (स.) आणि त्यांच्या उत्तराधिकाऱ्यांनी जिवाभावाने इस्लामचा स्वीकार केला. इस्लामद्वारे त्यांना आंतरिक शांती व बाह्य शक्तीची प्राप्ती झाली. याच कारणामुळे त्यांनी अत्यंत बलाढ्य साम्राज्य व शक्तींना टक्कर दिली. ईश्वरी विश्वासच त्यांच्या पराक्रम व धैर्याचा आधार बनला. ईश्वराच्या मार्गात प्राणार्पण करण्यास ते आपले सौभाग्य व मृत्यूला मधापेक्षा गोड समजत असत.

कुरआनप्रमाणे इस्लाम धर्माचा आरंभ आदरनीय आदम (अ.) पासून होतो. पुढे विभिन्न युगात विभिन्न प्रेषितांद्वारे त्यांचे महत्त्वपूर्ण सिद्धान्त प्रकाशात येत राहिले. सरतेशेवटी प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर अल्लाहने अशी वह्य (ईशसंदेश) उतरविली की "आज मी तुमच्या धर्माला तुमच्यासाठी परिपूर्ण केले आहे आणि माझ्या देणग्या तुमच्यावर पूर्ण केल्या आहेत. याशिवाय तुमच्यासाठी इस्लामला तुमचा धर्म म्हणून कबूल केले आहे."[३] अशाप्रकारे माननीय आदम (अलै.) यांच्यापासून आदरणीय मुहम्मद (स.) यांच्यापर्यंत एक लक्ष २४ हजार प्रेषित झाले आहेत आणि त्या सर्वांचा धर्म इस्लामच होता. यांच्यापैकी काही प्रेषितांची नावे माहीत आहेत, बाकीचे अज्ञात आहेत.

---

१. "हे प्रेषित! तुम्ही त्यांच्या मालमत्तेतून 'सदका' (दान-धर्म) घेऊन त्यांना शुद्ध करा आणि त्यांच्या आत्म्याला विकसित करा व त्यांच्यासाठी प्रार्थना करा. नि:संसय तुमची प्रार्थना त्यांच्यासाठी संतोषाचा खजिना आहे आणि अल्लाह ऐकणारा व जाणणारा आहे." -सूरह अत तौबा-१०३

२. "नि:संदेह पहिले घर जे लोकांसाठी बनविले गेले तेच आहे जे मक्केत आहे, संपूर्ण जगासाठी ते भरभराट व मार्गदर्शनाचे केंद्र होय. तेथे स्पष्ट चिन्हे आहेत. इब्राहीमचे निवासस्थान आहे. ज्याने त्यात प्रवेश केला, तो निश्चिंत झाला आणि लोकांवर अल्लाहचा हक्क आहे की ज्याच्यात तेथपर्यंत पोचण्याचे सामर्थ्य असेल त्याने त्या गृहाचा हज करावा आणि ज्याने नकार दिला तर अल्लाह संपूर्ण जगाशी बेपर्वा आहे."-सूरह आले इमरान-९६,९७

३. कुरआन - ५ : सूरह अल माइदा - ३.

# इस्लाम धर्म व तत्त्वज्ञान

इस्लामच्या दृष्टीने मनुष्य या पृथ्वीवर अल्लाहचा प्रतिनिधी आहे.[१] ज्याअर्थी त्याने मनुष्याला इतके श्रेष्ठत्व प्रदान केले आहे त्याअर्थी त्याचे हे कर्तव्य ठरते की त्याने आपल्या निर्मात्याची बंदगी करावी आणि त्या उंचीपर्यंत पोचावे की जेथे त्याने अल्लाहचे खरोखर प्रतिनिधित्व करून आपल्या अस्तित्वाला सार्थक बनवू शकावे. म्हणून या उंचीपर्यंत पोचण्यासाठी प्रत्येक मुस्लिम खालीलप्रमाणे पाच धार्मिक कृत्याने आपल्या उद्देशाची पूर्तता करतो- (१) तौहीद (एकेश्वरवाद), (२) नमाज अथवा सलात, (३) रोजा (उपवास), (५) जकात (दान) आणि (५) हज (तीर्थयात्रा).

**१. तौहीद (एकेश्वरवाद)**

इस्लाम शुद्ध 'तौहीद' (एकेश्वरवाद)च्या आचरणाचा धर्म आहे. तो अल्लाह आणि सेवकादरम्यान प्रेषितांना मार्गदर्शक मानतो. इस्लाम पुरोहितवाद मान्य करीत नाही. तो कोणत्याही साकार सत्तेला उपासनेचा आधार बनवीत नाही ज्याला माणसाने आध्यात्मिक चिंतनाच्या समयी आराध्याप्रमाणे वसवून आपले संपूर्ण ध्यान व शक्ती त्यावर केंद्रित करावी आणि त्यात तन्मय व्हावे. यात प्रतिमा अथवा मूर्तीसारख्या एखाद्या माध्यमाची गरज नाही. इस्लाम एक असा धर्म आहे जो विचारांचे पावित्र्य, चिंतनाची उंची, संकल्प व इच्छेचा निर्मळपणा, अल्लाहव्यतिरिक्त अन्य वस्तूपासून विरक्तता, कर्मनिष्ठा व चिंतन आणि विश्वासाच्या त्या धरातलावर स्थित आहे की त्यांच्यापेक्षा उत्तम मानदंड व उच्च धरातलाची कल्पनादेखील केली जाऊ शकत नाही.[२]

इस्लाममध्ये 'अल्लाह' पृथ्वी आणि आकाशाचा सम्राट,[३] सर्वज्ञ,[४]

---

१. "आणि आठवण करा जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने फरिश्त्यांना (देवदूतांना) सांगितले, 'मी पृथ्वीवर खलीफा (प्रतिनिधी) बनविणार आहे.' ते म्हणाले, 'काय तू बिघाड व रक्तपात करणाऱ्यांची तेथे नेमणूक करणार आहेस? आणि आम्ही तुझ्या स्तुतिबरोबरच तुझा महिमा गातो व तुझ्या पावित्र्याचे वर्णन करतो." -२:सूरह अल बकरा-३०-३४

२. अबुल-हसन अली नदवी, अरकान-ए-अरबअ; तिर्मिजी व नसई, पृ. २९१

३. "काय हे तुम्हाला माहीत नाही की आकाश व पृथ्वीचे राज्य अल्लाहसाठीच आहे आणि तुमचा अल्लाहशिवाय कोणी संरक्षक मित्रही नाही आणि सहाय्यकही नाही." -२:अल बकरा-१०७

४. "तोच तर आहे ज्याने तुमच्यासाठी पृथ्वीच्या सर्व वस्तू निर्माण केल्या. नंतर वरच्या दिशेकडे लक्ष दिले आणि अगदी बरोबर व संतुलितपणे सात आकाश बनविले. तो प्रत्येक गोष्ट जाणणारा आहे.-अल बकरा-२९

अत्यंत उदार, क्षमाशील,[१] करुणामय व कृपाळू[२] आहे. तो सर्वशक्तिमान शासक,[३] सृष्टा,[४] पालनकर्ता,[५] सेवकासाठी जीवनाच्या सुखसोयी देणारा[६] आणि एकमेव आहे.[७] त्याच्याशिवाय कोणीही उपास्य नाही.[८] 'ला इलाहा इल्लल्लाहु मुहम्मदुर्रसूलुल्लाह' (अल्लाहशिवाय इतर कोणीही ईश्वर नाही. मुहम्मद अल्लाहचे प्रेषित आहेत) एकेश्वरवादाची आधारशिला आहे. हाच मुस्लिमांच्या धर्माचा मूलमंत्र आहे. इस्लाममध्ये एकेश्वरवादाला सोडून अनेकेश्वरवादाचा अवलंब करणे वर्ज्य आहे. अनेकेश्वरवाद केवळ माणसाच्या कल्पनेचा द्योतक आहे. अनेकेश्वरवादामुळे मनुष्याचे ईश्वरासंबंधी ध्यान दुर्बळ बनते. अल्लाह व दासाचा संबंध तुटतो. म्हणून इस्लाममध्ये अनेकेश्वरवादाला फार मोठे पाप मानले आहे.

---

१. "माझ्या दासांना सूचना द्या की मी फारच क्षमाशील आणि दया करणारा आहे."-१५:सूरह अल हिज्र-४८

२. "ज्या लोकांनी इन्कार केला, 'ग्रंथधारक' असोत अथवा 'अनेकेश्वरवादी' कोणीही असे इच्छित नाही की तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यावर एखादी चांगली गोष्ट उतरविली जावी, आणि अल्लाह ज्याला इच्छितो त्याला आपल्या दयेसाठी विशिष्ट करतो आणि अल्लाह मोठा कृपाळू आहे."-२:सूरह अल बकरा-१०५

३. "आकाश व पृथ्वी आणि जे काही त्यांच्या दरम्यान आहे त्या सर्वांचे राज्य अल्लाहसाठीच आहे आणि त्याला प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य प्राप्त आहे."-५:सूरह अल माइदा-१२०

४. "तो आकाश व पृथ्वीसारख्या निराळ्या नवीन गोष्टींचा निर्माता आहे. जेव्हा तो एखाद्या गोष्टीचा निर्णय घेतो तेव्हा त्यासाठी केवळ असे म्हणतो 'हो' तर ती गोष्ट अस्तित्वात येते." -२:सूरह अल बकरा-११७

५. "सर्व स्तुती अल्लाहसाठीच आहे जो संपूर्ण जगाचा पालनकर्ता आहे."-१:अल फातिहा-१

६. "तोच आहे ज्याने तुमच्यासाठी पृथ्वीला अंथरुण व आकाशाला आच्छादन बनविले. आकाशातून पाणी उतरविले आणि त्याद्वारे तुमच्या अन्नासाठी सर्व प्रकारचे खाद्य पदार्थ उत्पन्न केले. मग जेव्हा तुम्ही जाणता तेव्हा अल्लाहचा समवर्ती बनवू नका."-२:सूरह अल बकरा-२२

७. "जर या दोहों (आकाश व पृथ्वी) मध्ये अल्लाहशिवाय अन्य दुसरे उपास्यसुद्धा असते तर दोहोंच्या व्यवस्थेत बिघाड आला असता. तर मग अल्लाहच्या महिमेच्या, जो राजसिंहासनाचा पालनकर्ता आहे, प्रतिकूल आहे, जो गुण हे सांगत आहेत."-२१:सूरह अल अंबिया-२२

८. "तुम्ही त्याच्याशिवाय ज्याची उपासना करीत आहात ते याशिवाय अन्य काही नाहीत की केवळ नावे आहेत, जी तुम्ही व तुमच्या पूर्वजांनी ठेवली आहेत. अल्लाहने त्यांच्यासाठी कोणतीही सनद उतरविली नाही. आज्ञा (शासनाधिकार) तर केवळ अल्लाहची आहे. त्याने आज्ञा दिली आहे की त्याच्याशिवाय इतर कोणाची उपासना करू नका. हाच योग्य व सरळ मार्ग आहे. परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत."-१२:सूरह यूसुफ-४०

## २. नमाज अथवा सलात (प्रार्थना)

नमाज म्हणजे इस्लामच्या पाठीचा कणा, धर्माचा स्तंभ, मुक्तीसाठी अट, विश्वासाची रक्षक व पावित्र्याचा पाया आहे. दिवसातून पाच वेळा नमाज अदा करण्याचा आदेश आहे.[१] ही निश्चित वेळी अल्लाहचे स्मरण होय.[२] या व्यवस्थेचे पालन करून मुस्लिम पाच वेळा अल्लाहसमोर उपस्थित होऊन पाप-कृत्यापासून अलिप्त राहण्यासाठी प्रार्थना करतो व सत्य-मार्गावर चालण्याचे सामर्थ्य प्राप्त करतो. ही यशाची गुरुकिल्ली आहे.[३] अल्लाहच्या बंदगीचे विधान आहे.[४] नमाज प्रत्येक व्यक्ती मग ती स्वतंत्र असो अथवा गुलाम, धनी असो की दरिद्री, रोगी असो वा निरोगी, वाटसरू असो की कायमचा वास्तव्य करणारा; सर्वांवर प्रत्येक परिस्थितीत अनिवार्य आहे. कोणतीही सज्ञान व्यक्ती कोणत्याही स्थितीत यापासून मुक्त राहू शकत नाही. विशेष परिस्थितीत क़ज़ा[५] द्वारा नमाजची पूर्तता केली जाऊ शकते. जकात, रोजा, हजसंबंधी काही अटींवर सूट मिळू शकते अथवा त्यात काही सवलतीची आज्ञा आहे; परंतु नमाजसाठी असली कोणतीही शक्यता नाही, येथपावेतो की युद्धभूमीवरसुद्धा नमाज अनिवार्य आहे.

नमाज अशी कृती आहे ज्यात शरीर, बुद्धी आणि हृदय सामील होतात आणि या तिन्हीत तत्त्वज्ञान व विवेकाचे सुंदर सामंजस्य विद्यमान असते. शरीराकडे 'क़याम' (उभे राहणे), 'रुकूअ' (गुडघ्यावर हात ठेवून वाकणे) आणि 'सजदा' (जमिनीवर कपाळ टेकणे) च्या कृती करण्याची जबाबदारी येते. जिभेकडे 'तिलावत' (पवित्र कुरआनच्या आयतींचे पठन) आणि 'तस्बीह' (अल्लाहचे नामस्मरण) चे काम आले आहे. बुद्धीकडे चिंतन व हृदयाकडे

---

१. (१) नमाजे फज्र (सूर्योदयापूर्वी), (२) नमाजे जुहर (मध्यान्हानंतर), (३) नमाजे अस्र (तीन प्रहरानंतर), (४) नमाजे मग़रिब (सूर्यास्तानंतर) आणि (५) नमाजे इशा (रात्री प्रथम प्रहरात).

२. "मग जेव्हा तुम्ही नमाज पूर्ण कराल तेव्हा उठता, बसता व पहुडले असता प्रत्येक वेळी अल्लाहचे स्मरण करा. जेव्हा तुम्हाला सवड होईल तेव्हा पूर्ण नमाज अदा करा. नि:संशय श्रद्धावंतांवर योग्य वेळी नमाज अदा करण्याचे आवश्यक बंधन आहे."-४:सूरह निसा-१०३

३. "तो सफल झाला ज्याने स्वत: शुद्धता अंगिकारिली व आपल्या पालनकर्त्याचे नामस्मरण करून नमाज अदा केली."-८७:सूरह अल आला-१४-१५

४. "नि:संशय मी अल्लाह आहे. माझ्याशिवाय कोणीही उपास्य नाही. म्हणून तू माझी उपासना कर आणि माझ्या स्मरणासाठी नमाज अदा करीत राहा."-२०:सूरह ताहा-१४

५. जर नमाजची ठराविक वेळ निघून गेल्यास, इस्लाममध्ये कजा नमाज अदा करण्याचा आदेश आहे.

ईश्वरासंबंधी तन्मयता व भक्तीभावाने द्रवित होण्याचे महत्कार्य आले आहे. दिवसात पाच वेळेच्या नमाजव्यतिरिक्त 'ईदुल फित्र' (रमजान ईद), 'ईदुल अजहा' (बकरीद), सूर्य अथवा चंद्रग्रहण, विपत्ती, मृत्यू वगैरेच्या वेळीसुद्धा नमाज अदा केली जाते. रमजानच्या महिन्यात 'तरावीह'ची नमाज अदा केली जाते. आदरणीय मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे– "सर्वांत पहिली गोष्ट जिचा 'कियामत' (प्रलय दिन)च्या दिवशी दासाकडून हिशेब घेतला जातो ती नमाज होय. जर ही बरोबर निघाली तर तो यशस्वी झाला आणि जर बरोबर ठरली नाही तर तो अयशस्वी व निराश झाला. जर त्याच्या 'फर्ज' (अनिवार्य) नमाजच्या अपेक्षित संख्येत कमतरता दिसली तर महान अल्लाह म्हणेल, पाहा माझ्या दासाच्या कृतीपत्रात काही 'नफिल' (जी अदा केली नाही तरी चालते) नमाजांचा उल्लेख आहे काय? मग त्याने अनिवार्यची संख्या पूर्ण केली जाईल व इतर कृतींच्या बाबतीतसुद्धा असाच व्यवहार केला जाईल.[१]

अशाप्रकारे इस्लाममध्ये नमाजचे महत्त्व अन्य सिद्धान्तांपेक्षा अधिक आहे.

### ३. रोजा (उपवास)

मनुष्य अल्लाहने निर्माण केलेली विलक्षण रचना आहे. हे शरीर आणि आत्म्याचे समन्वित रूप आहे. जर आत्म्याचा प्रभाव शरीरापेक्षा अधिक झाला तर मनुष्याचा ऐहिक जीवनाशी संबंध तुटून तो भगवद्भक्तीमध्ये निमग्न होतो आणि जर शरीराला आत्म्याच्या तुलनेने अधिक महत्त्व दिले गेले तर मनुष्य विलासी बनतो. म्हणून इस्लामने माणसाला या दलदलीपासून वाचविण्यासाठी रमजान महिन्याचे रोजे अनिवार्य केले आहेत. पवित्र कुरआनमध्ये मुस्लिमांवर उपवास अनिवार्य केले गेले आहेत.[२]

याचा उद्देश माणसाच्या आध्यात्मिक व नैतिक विकासाबरोबरच हृदय आणि आत्म्याची शुद्धी आहे. हा माणसाला धर्मपरायण व संयमी बनवितो. उपवास केला असता तो अनेक दुष्कृत्ये आणि अवज्ञांपासून वाचवितो आदरणीय मुहम्मद (स.) यांच्या हदीस (प्रेषितांची वचने) अनुसार रोजा

---

१. अबुल-हसन अली नदवी, अरकान-ए-अरबअ : तिर्मिजी व नसई, पृ. ९८.

२. "हे श्रद्धावंतांनो! तुमच्यावर रोजा अनिवार्य केला गेला आहे. ज्याप्रकारे तुमच्या पूर्वीच्या लोकांवर अनिवार्य केला गेला होता, जेणेकरून तुम्ही (अल्लाहचे) भय बाळगणारे बनावे."
-२: सूरह अल बकरा-१८४

(जीवनसंघर्षात) एक ढाल आहे.

सूर्योदयापूर्वी पहाटे 'सहरी' (उपवासासाठी जेवण) च्या वेळेपासून सूर्यास्तापर्यंत अन्न, पाणी वगैरे वर्ज्य आहे. उपवासात पाच वेळची नमाज व्यतिरिक्त ध्यान, ज्ञान व कुरआन-पठनावर विशेष भर दिला गेला आहे. अशाप्रकारे शरीर व हृदयाला विभिन्न वाईट गोष्टींपासून मुक्त ठेवण्याचा प्रयत्न केला गेला आहे. सूर्यास्त झाल्यावर 'इफ्तार' (उपवास सोडणे) करतात. वयात आलेल्या प्रत्येकासाठी रोजा अनिवार्य केला गेला आहे. विशेष परिस्थितीत धार्मिक अटीसह रोजाऐवजी काही अन्य अनुष्ठानांचा आदेश दिला गेला आहे. उपवासांच्या पूर्ततेनंतर मनुष्य आपल्या कर्तव्यापासून उऋण होऊ शकतो.

## ४. जकात (दान)

या जगात मनुष्याच्या सुख-सोयीसाठी अल्लाहने विविध प्रकारच्या वस्तू निर्माण केल्या आहेत. जगातील सर्व वस्तू फक्त मूठभर लोकांच्या ताब्यात राहू नयेत म्हणून त्याने असे नियम बनविले आहेत, ज्यांचे पालन करून प्रत्येक माणसाला आवश्यक व जीवनोपयोगी वस्तू दुसऱ्यापर्यंत पोचविता याव्यात. हा विधी माणसातील परस्पर प्रेम व त्यागाच्या भावनेला बळ देते. याकरिता इस्लाममध्ये जकात (चाळीसावा भाग), खुम्स (पाचवा भाग), खैर-खैरात (दानधर्म) आणि सदका (दान) करण्याचा आदेश आहे.[१] यामुळे इहलोक व परलोकात मनुष्याचा उद्धार होतो. यापैकी दानधर्म पुण्यकर्म असूनसुद्धा अनिवार्य नाही. परंतु कुरआनमध्ये धन-संपत्तीवर खुम्स आणि जकातची अनिवार्यता घोषित केली गेली आहे.[२] ही ईश्वराने दिलेल्या वस्तूंबद्दल कृतज्ञतेची अभिव्यक्ती,[३] विभिन्न प्रकारच्या वाईट गोष्टींपासून मुक्ती[४] व मन-मस्तिष्काच्या

१. "त्यांनी जर तोबा (पश्चात्ताप) केली आणि नमाज सुरू केली व जकात दिली तर ते तुमचे धर्म-बंधु आहेत."-सूरह अत तौबा-११

२. "जे नमाज अदा करतात आणि जकात देतात आणि ते असे आहेत जे मरणोत्तर जीवनावर विश्वास ठेवतात."-सूरह अन नम्ल-३

३. "माझ्या ज्या दासांनी श्रद्धा बाळगली आहे त्यांना सांगा त्यांनी नमाज अदा करीत राहावे आणि जे काही आम्ही त्यांना दिले आहे त्यापैकी गुप्तपणे व उघडरीत्या खर्च करावे, त्यापूर्वी की तो दिवस यावा जेव्हा कोणताही सौदा आणि कोणतीही मित्रता होणार नाही."-सूरह इब्राहीम-३१

४. "आणि जर तुम्ही उघडपणे सदका दिला तर हीसुद्धा चांगली गोष्ट आहे आणि जर ते लपवून गरिबांना दिले, तर हे तुमच्यासाठी जास्त चांगले आहे आणि ते तुमच्या कित्येक वाईट गोष्टींना दूर करील आणि अल्लाहला जे काही तुम्ही करता त्याची माहिती असते."-२: बकरा-२७१

शुद्धीचे साधन होय.[१] ईश्वराच्या कृपेला पात्र बनण्यासाठी जकात देणे आवश्यक आहे.[२]

वर्षात एकदा ज़कात देणे आर्थिकदृष्ट्या संपन्न मुस्लिमासाठी अनिवार्य आहे. याचे प्रमाण विभिन्न प्रकारच्या गोष्टी (शेती व बाग, पशु, बहुमूल्य वस्तू, व्यापार, नोकरी वैगरे) वर ठरविले गेले आहे. शेती व बागेची जकात उत्पन्न आल्यानंतर दिली जाते. अकस्मात प्राप्त झालेल्या लाभावर पूर्ण वर्ष व्यतीत होण्याची वाट न पाहता लगेच 'खुम्स' अर्थात पाचवा भाग देणे आवश्यक आहे. ज्या उत्पन्नासाठी मनुष्य स्वत: परिश्रम करतो त्यावर 'उश्र' अर्थात दहावा भाग दिला जातो.

**५. हज्ज (तीर्थयात्रा)**

'हज्ज' म्हणजे तीर्थ-दर्शन करणे. हज्ज एक उपासना आहे ज्यात मनुष्य अल्लाहच्या घराचे अर्थात काबागृहाचे दर्शन करण्याच्या इच्छेने मक्केला जातो. 'हज्ज-ए-बैत-उल्लाह' अल्लाहबद्दल अपार श्रद्धा, प्रेम, दासत्व आणि अल्लाह-प्रशंसेचे द्योतक आहे. काबागृह अल्लाहच्या उपासनेचे केंद्र आहे आणि शांतीचे स्थान आहे.[३] परिस्थिती, अर्थ व स्वास्थ्याच्या दृष्टीने संपन्न असलेल्या व्यक्तीसाठी हज्ज अनिवार्य आहे.[४] क़ुरआनमध्ये हज्जच्या महत्त्वाची

---

१. "हे प्रेषित! तुम्ही त्यांच्या संपत्तीतून 'सदका' घेऊन ती शुद्ध करा आणि त्यांचा आत्मा विकसित करा व त्याच्यासाठी प्रार्थना करा. नि:संशय तुमची प्रार्थना त्यांच्यासाठी संतोष-निधी आहे. अल्लाह ऐकणारा व जाणणारा आहे."-९:सूरह अत तौबा-१०३

२. "तुम्ही पुण्यशीलता व प्रामाणिकपणाच्या दर्जाला तोपर्यंत पोचू शकत नाही जोपर्यंत तुम्ही आपल्या त्या वस्तूतून खर्च करीत नाही, ज्या तुम्हाला प्रिय आहेत आणि जी वस्तू तुम्ही खर्च कराल ती अल्लाहला माहीत असते."-३:सूरह आले इमरान-९२

३. "आणि स्मरण करा जेव्हा आम्ही हे घर (काबा) लोकांसाठी केंद्र व शांतिस्थळ बनविले आणि आज्ञा दिली की इब्राहीमच्या निवासस्थानाला नमाजचे एक स्थान बनवा. इब्राहीम व इस्माईलला जबाबदार बनविले की माझ्या घराचा 'तवाफ' (परिक्रमा) व 'एतकाफ' (मस्जिदमध्ये राहून उपासना करणे व जगातील व्यवहारापासून अलिप्त राहणे) आणि रुकूअ व सजदा करणाऱ्यांसाठी पवित्र ठेवा."-२:सूरह अल बकरा-१२५

४. "नि:संदेह पहिले घर जे लोकांसाठी बनविले गेले आहे तेच आहे जे मक्केत आहे. साऱ्या जगासाठी भरभराट व मार्गदर्शनाचे केंद्र आहे. तेथे स्पष्ट निशाण्या आहेत, इब्राहीमचे निवासस्थान आहे. ज्याने त्यात प्रवेश केला तो सुरक्षित झाला आणि लोकांवर अल्लाहचा अधिकार आहे की ज्याच्यात तेथपर्यंत पोचण्याचे सामर्थ्य आहे त्याने त्या घराचा हज्ज करावा आणि ज्याने इन्कार केला तर अल्लाह सर्व जगापासून बेपर्वा आहे."-३:सूरह आले इमरान-९६,९७

व्यापक चर्चा केली गेली आहे.[१] काबागृहाच्या दर्शनामुळे अल्लाहच्या स्मरणाबरोबरच अनेक विस्मृत घटना जीवनाशी पुन्हा जुडतात. ही अल्लाहची मौल्यवान देणगी, ठेव आणि निशाणी- एकेश्वरवाद, प्रेषितांचे धर्मयुद्ध व संयम- ची द्योतक आहे. हज्ज इस्लामी राष्ट्रीयतेच्या विषयाचे प्रतीक आहे जेथे सर्व भेदभाव नष्ट होऊन केवळ ऐक्य बाकी उरते. येथे आल्यावर सर्व इस्लामी देश आपल्या देशाची व राष्ट्राची वेशभूषा जी त्यांची विशेष ओळख आहे ज्यामुळे देशीय विषमता उत्पन्न होते, तिचा त्याग करून सर्वजण एकसमान पोषाख करतात ज्याला 'अहराम' असे म्हणतात. सर्वजण एकत्रपणे मोठ्या नम्रता व विनयाने एकाच भाषेत एकच उद्‌घोष करतात-

"अल्लाहुम्मा लब्बैक - लब्बैक ला शरीका लका लब्बैक - इन्नल हम्द वन्नेअमता लका वल मुल्क ला शरीक लका."

**अर्थात-** हजर आहे, हे अल्लाह! मी तुझ्या हुजुरात हजर आहे. तुझा कोणीही भागीदार नाही. मी तुझ्या हुजुरात हजर आहे, निश्चितच स्तृती हजर आहे, हे अल्लाह! मी तुझ्या हुजुरात हजर आहे. तुझा कोणीही भागीदार नाही. मी तुझ्या हुजुरात हजर आहे, निश्चितच स्तुती तुझ्यासाठीच आहे. सर्व उपकार तुझेच आहेत. बादशाही सर्वथा तुझीच आहे. तुझा कोणीही भागीदार नाही.

उक्त पाच धार्मिक अनुष्ठानांवर इस्लामचा पाया अवलंबून आहे. यांच्याद्वारे व्यक्ती अंतर्गत व बाह्यजगत यामध्ये संतुलन स्थापित करण्याची अपूर्व क्षमता प्राप्त करून घेते.

१. "आणि लोकांना हज्जसाठी हाक द्या की त्यांनी प्रत्येक खोल मार्गाने, पायी व सडपातळ उंटिणीवरून तुझ्याजवळ यावे जेणेकरून त्यांनी आपले लाभ पाहावेत (जे येथे त्यांच्यासाठी ठेवलेले आहेत) आणि काही ठराविक दिवसांत त्या चतुष्पाद पाळीव जनावरावर अल्लाहचे नाव घ्यावे जी अल्लाहने त्यांना दिली आहेत. मग त्यातून स्वत: खा आणि कठीण परिस्थितीत असलेल्या मोताद लोकांनासुद्धा खाऊ द्यावे. त्यानंतर आपली घाण-घूण दूर करावी. आपले नवस फेडावे आणि या पुरातन घराची (काबा) परिक्रमा करा."-२२:सूरह अल हज्ज-२७-२९

# राजनीतिक आणि आर्थिक परिवेश

कुरआनमध्ये इस्लामचा राजनीतिविषयक मौलिक दृष्टिकोन,[१] कायदा व आज्ञापालन,[२] खिलापत,[३] सल्लागार परिषद,[४] घटनेचे मूळ सिद्धान्त,[५] राज्याचा उद्देश, मूळ अधिकार,[६] परराष्ट्र धोरण[७] आणि जिहाद (धर्मयुद्ध)[८] संबंधी व्यापक निर्देश विद्यमान आहेत.

अल्लाह आणि मनुष्य व जगात मनुष्याच्या पारस्परिक संबंधांच्या व्याख्येचे नाव इस्लाम आहे. तो मनुष्याला याचा दुहेरी संबंधासह जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात चालण्याचा निदेर्श देतो. मनुष्याचे मन, वचन व कर्माचे प्रत्येक क्षेत्र इस्लामच्या दृष्टीत आहे. असली कृत्ये जी मनुष्य आणि अल्लाहच्या संबंधांना दुर्बल बनवितात अथवा त्यांच्या पारस्परिक संबंधांना तोडतात

---

१. ''तो अल्लाह आहे, तो की ज्याच्याशिवाय कोणीही उपास्य नाही, सर्वशासक आहे, अत्यंत गुणवान, शांतिस्वरूप, आश्रयदाता, संरक्षक, प्रभुत्वशाली, प्रभावशाली, अत्यंत महान.''-५९:सूरह अल हश्र-२३

२. ''आम्ही तौरातमध्ये त्यांना आज्ञा दिली होती की जिवासाठी जीव, डोळ्याबद्दल डोळा, नाकासाठी नाक, कानासाठी कान, दातांच्या बदल्यात दात आणि सर्व प्रकारच्या आघातासाठी बरोबरीचा बदला आहे. मग जो त्यानुसार निर्णय करीत नाही जसा अल्लाहने उतरविला आहे तर असेच लोक जुलूम करणारे आहेत.''-५:सूरह अल माइदा-४५

३. ''हे दाऊद! आम्ही तुला पृथ्वीचा प्रतिनिधी बनविले आहे म्हणून तू लोकांदरम्यान सत्य मार्गाने राज्य कर आणि स्वत:च्या इच्छेनुसार करू नकोस; कारण ती तुला अल्लाहच्या मार्गापासून दूर करील.''-३८:सूरह साद-२६

४. ''हे प्रेषित! तुम्ही आपल्या कामात सल्लामसलत करीत जा.''-२:सूरह अल बकरा-१५९

५. ''हे श्रद्धावंतांनो! अल्लाहचा आदेश माना आणि प्रेषितांचा आदेश माना आणि त्यांचा जे तुमच्या दरम्यान अधिकारी आहेत, तथापि जर तुमच्यामध्ये एखाद्या बाबतीत भांडण झाले तर कुरआन व प्रेषित (स.) यांनी दिलेल्या आदेशानुसार निर्णय करा.''-४:सूरह अन निसा-५९

६. ''कोणत्याही प्राण्याला ठार करू नका, ज्याला अल्लाहने निषिद्ध ठरविले आहे सत्याविना.'' -१७:सूरह बनी इसराईल-३३

''हे श्रद्धावंतांनो! परस्पर एकमेकाचा माल अवैधरीत्या खाऊ नका, याला अपवाद असा की तुमच्या आपापसात खुशीने एखादा सौदा व्हावा आणि स्वजनांची हत्या करू नका.''-४:सूरह अन निसा-२९

७. ''समझोत्यानंतर जर एखाद्या जातीने धोका दिला तर प्रथम झालेला ठराव समाप्त करा मग एखादी कारवाई करा.''-८:सूरह अल अनफाल-५८

८. ''ज्या लोकांनी श्रद्धा बाळगली ते अल्लाहच्या मार्गात युद्ध करतात आणि ज्या लोकांनी इन्कार केला ते शैतानाच्या मार्गात युद्ध करतात.''-४:सूरह अन निसा-७६

त्यांना इस्लाम अयोग्य मानतो आणि त्यांच्यापेक्षा असल्या आचरणावर भर देतो जे मनुष्य आणि ईश्वर व माणसांच्या पारस्परिक संबंधांना दृढ बनवितो.

अल्लाह सृष्टीचा निर्माता आहे, शासक आणि अधिकारसुद्धा. मनुष्य अल्लाहने निर्माण केलेली सर्वश्रेष्ठ रचना आहे. विश्वाच्या सर्व वस्तू मनुष्याच्या उपयोग व सुख-सोयीसाठी आहेत. मनुष्याद्वारे या वस्तूंचा होणारा उपयोग विविध प्रकारच्या कला व विज्ञानाचे मूळ स्रोत होय. याचा पाया इस्लाममध्ये प्रतिपादित दुहेरी संबंधावर आधारित आहे. अशीच स्थिती इस्लाममध्ये निर्देशित अर्थव्यवस्थेची आहे. या बाबतीत कुरआन आणि प्रेषित मुहम्मद (स.) यांनी विविध प्रकारच्या सिद्धान्त व नियमांवर प्रकाश टाकला आहे याच पूर्वनिर्वारित आर्थिक व्यवस्थेमुळे इस्लामी अर्थशास्त्र गूढ व जटिल न बनता अत्यंत स्पष्ट व सरळ आहे.

अल्लाहने मनुष्याला जीवन-निर्वाहाची साधने प्रदान केली आहेत.[१] याची जबाबदारी अल्लाहवर आहे. म्हणून अल्लाहशी संबंध टिकवून ठेवणे माणसाचे परमकर्तव्य होय. जो मनुष्य अल्लाहशी संबंध टिकवून ठेवील निश्चितपणे तो अन्य लोकांशीसुद्धा संबंध टिकवील आणि या संबंधांच्या रक्षणासाठी तो अनेक दोषपूर्ण स्थितीपासून दूर राहू शकेल. परस्पर संबंधासाठी ही जागरुकता वर्गगत विषमतेपासून जीवन व राष्ट्राला मुक्त करते.[२]

संपत्ती संचय करणे व ती खर्च न करणे अयोग्य होय.[३] इस्लाम याच्या विरूद्ध आहे. पुंजी गोळा करणे, लपविणे वगैरे कृत्ये इस्लामी सिद्धान्तांच्या विरूद्ध आहेत.[४] यामुळे जीवनाच्या संपूर्ण व्यवस्थेत विघ्न येते. अल्लाह व

---

१. "मग त्याने तुम्हाला निवारा दिला आणि आपल्या मदतीने तुम्हाला शक्ती दिली. तुम्हाला पवित्र आणि चांगल्या पदार्थांची रोजी दिली जेणेकरून तुम्ही कृतज्ञ बनावे."-८:अनफाल-२६

२. "आणि आम्ही आदमच्या संततीला श्रेष्ठत्व प्रदान केले. त्याला भूमी व समुद्रात वाहन दिले. त्याला शुद्ध पदार्थांची रोजी दिली आणि अशा बहुतेकांपेक्षा ज्यांना आम्ही निर्माण केले आहे मोठेपण दिले."-बनी इसराईल-७०

३. "विनाश आहे त्या प्रत्येक माणसासाठी ज्याला टोमणे मारण्यासाची व निंदा करण्याची खोड आहे.. ज्याने संपत्ती गोळा केली आहे आणि जो पुन्हा पुन्हा ती मोजत राहतो. असे समजतो की त्याच्या संपत्तीने त्याला अमर करून टाकले. काही नाही त्याला अवश्य फेकून दिले जाईल 'हुतमा' (गिळंकृत करणारी) नरकामध्ये."-१०४ : सूरह अल हमजा-१-४

४. "भुरळ पाडली आहे तुम्हाला जास्तीत जास्तच्या तुमच्या इच्छेने. येथपावेतो की तुम्ही स्मशानभूमी पाहिली. काहीही असो तुम्हाला लवकरच कळेल- निश्चितच तुम्ही भडकणारा अग्नी पाहाल. मग तुम्हाला त्या दिवशी सुख-समृद्धीविषयी अवश्य विचारले जाईल."-अत तकासुर-१,२,३,६

मनुष्याचे आध्यात्मिक संबंध व मनुष्य-मनुष्यादरम्याच्या भौतिक संबंधांचे तारतम्य समाप्त होते. इस्लाम परिश्रमाने केलेल्या धनप्राप्तीलाच मान्यता देतो. या कारणामुळेच इस्लाममध्ये व्याज, जुगार वगैरेंचा निषेध केला गेला आहे. धनोपार्जन व खर्चाच्या औचित्यासंबंधी हदीसची ही ओळ उल्लेखनीय आहे-

"माणसाला विचारले जाईल की याने कोणत्या मार्गाने संपत्ती गोळा केली आणि कोणत्या बाबीवर खर्च केली.[१]"

हे अगोदर सांगितले गेले आहे की अल्लाह सृष्टा व शासक आहे. संपूर्ण सृष्टीचा विस्तार मनुष्यासाठी आहे. अल्लाहने दिलेल्या वस्तूंच्या उपयोगात उच्च-नीच, श्रीमंत-गरीब, जातपात यासारख्या विषमतेचा प्रश्नच येत नाही. इस्लाममध्ये प्रतिपादित बंधुभाव याच आर्थिक सिद्धान्तावर आधारित आहे.

१. मनाजिर अहसन गीलानी : इस्लामी मआशियात, भाग-२, पृष्ठ-३६१

## सामाजिक परिप्रेक्ष्य

कुरआनमध्ये इस्लामी सामाजिक व्यवस्था आणि सदाचारासंबंधी शिक्षणाचे मूळ स्रोत लपलेले आहे. त्यात बंधुबाव, प्रेम-त्याग, योग्य-अयोग्य, कर्तव्य-अकर्तव्य आणि सामाजिक व्यवस्थेसंबधी व्यापक निर्देश दिलेले आहेत. मनुष्याला दुर्गुणातून मुक्त करणे,[३] त्यांच्यात नैतिक गुणांचा विकास करणे,[४] आई-वडील आणि इतर आप्तेष्ठ, अनाथ, विकलांग आणि शेजाऱ्याबद्दल कर्तव्य,[५] दंपत्तीचे जबाबदारीचे जीवन आणि आदर्श राहणी[६] व शिष्टाचाराच्या पद्धती शिकविणे,[७] कुरआन उद्देशांचे लक्ष्य आहे. ज्याच्या अभावामुळे जीवन आणि सामाजिक व्यवस्था पूर्ण होत नाही. एखाद्या उन्नत आणि सुगठित जीवन व सामाजिक व्यवस्थेसाठी उक्त आदेशांचे पालन करणे आवश्यक बनते.

प्रेषित मुहम्मद (स.) व त्यांचे उत्तराधिकारी चार आदर्श खलीफांच्या काळात सामाजिक जीवनाच्या स्वरूपाच्या याच सिद्धान्तांच्या आधारे सुगठित झाले होते.

म्हणून थोडक्यात अल्लाहने प्रेषित मुहम्मद (स.) द्वारे प्रस्तुत केलेली आध्यात्मिक व नैतिक विचारधारा 'इस्लाम'नुसार त्याचे अनुयायी 'मुस्लिम' आणि त्यांची संस्कृती 'इस्लामी संस्कृती' म्हणून संबोधिली जाते. इस्लामी संस्कृती अशा समाजाची जीवनपद्धती आहे ज्याची राहणी, खाणे-पिणे, वेशभूषा, आचार-विचार, रीती-नीती, धर्मदर्शन, राजनीती, अर्थव्यवस्था, साहित्य, कला, विज्ञान वगैरे कुरआन आणि हदीस (पैगंबर वचन) द्वारा निर्दिष्ट आहेत. जगात इस्लाम एक असा प्रवृत्तीमूलक स्वाभाविक धर्म प्रमाणित झाला आहे की ज्याच्या अंतर्गत जीवनाच्या आध्यात्मिक अविष्काराबरोबरच

---

२, अ) २:सूरह अल बकरा-२७,८४,१८८,२६४
   ब) ४:सूरह अन निसा-२९,३६,३७,१२८

३. अ) २:सूरह अल बकरा-१३४,१६५,१४६,१५३,१७७,२३७,२८०,२८३
   ब) ४:सूरह अन निसा-५८,८६,१३५

४. २:सूरह अल बकरा-८३,१७७,२१५,२२०

५. अ) २:सूरह अल बकरा-१२,८१८७,२२१,२२३,२२९,२३२,२३३,२३७,२४०
   ब) ४:सूरह अन निसा-३,४,१९,२०,२२,२३,२४,३४,३५,१२८,१२९

६. २४:सूरह अन नूर-२७,२९,५८,६१,६२

भौतिक जीवनात संतुलित सुरुचीपूर्ण आचरणावर भर दिला गेला आहे. इस्लाम ऐहिक व आध्यात्मिक जीवनादरम्यान संतुलन स्थापित करतो. तो आम्हाला निवृत्तीमार्ग स्वीकारून एकांतवासात देवतातुल्य बनण्याची प्रेरणाही देत नाही आणि तो याची प्रशंसाही करीत नाही की एखाद्या व्यक्तीने भौतिक भोगविलासात निमग्न राहून दैत्यतुल्य आचरण करावे. संशयातीत व संतुलित जीवनच इस्लामी जीवनाचा आधार आहे.

**-: *समाप्त* :-**

## प्रेषित मुहम्मद (स.) ची शिकवण

* दिवसातून पाच वेळा नमाज अदा करा, रमजानच्या महिन्यात उपवास करा, काबागृहाची यात्रा करा, तुमच्या मालमत्तेवर 'जकात' तत्परतेने द्या आणि मी (पैगंबर स.) जे काही आदेश देतो त्याचे पालन करा, असे झाले तरच तुम्हाला स्वर्गात प्रवेश मिळेल.
* एखाद्या श्रद्धावानाला शिवी देणे, हे मर्यादेचे उल्लंघन आहे, त्याच्यावर शस्त्र उचलणे ही मोठी अश्रद्धा व बेईमानी आहे, त्याच्या पश्चात त्याची निंदा करणे ही अल्लाहची अवज्ञा आहे, त्याच्या मालमत्तेचे अपहरण करणे हे त्याचे रक्त पिण्यासारखे आहे.
* पापकृत्ये माणसाला कृपेपासून वंचित करतात आणि त्याच्या भाग्यत बदल घडवून आणतात.
* तुमचा स्वामी ज्यामुळे प्रसन्न होईल अशी कृत्ये करीत राहा कारण ईश्वरापुढे वाचविणारा कोणीही नसेल.
* एखाद्याच्या कबरीवर छत्री बांधून त्याला उपासना-आराधनाचे स्थान बनविणे, त्याच्या तसबिरी लावून आरास करणे अशी कृत्ये अल्लाहच्या नजरेत निर्मितीतील सर्वात वाईट गोष्ट आहे.
* दुसऱ्यावर स्वत:ला कधीही प्राधान्य देऊ नका.
* सर्व गोष्टी अल्लाहच्या इच्छेप्रमाणे घडत असतात.
* कोणाच्याही गडबडीमुळे सर्व समर्थ व महान अल्लाह अंकित होत नाही.
* जो अल्लाहशी वैर करतो, त्यावर अल्लाह मात करतो.
* जो अल्लाहला फसविण्याचे कृत्य करतो, त्याला अल्लाह चकित करून सोडतो.
* जो अल्लाहच्या नावाने खोटी शपथ घेतो, तो वास्तविकपणे अल्लाहला खोटे ठरवितो.
* जो आपत्तींना धैर्याने व चिकाटीने तोंड देतो, त्याला अल्लाह भरपाई देतो.
* जो आपल्या कीर्तीसाठी व प्रतिष्ठेसाठी केवळ कार्य करतो, अल्लाह त्याला नामुष्की देतो.
* जो धीर व सहनशक्ती आणि सोशिकता दर्शवितो, त्याला अल्लाह दुहेरी इनाम देतो.
* जो अल्लाहची अवज्ञा करतो, त्याला अल्लाह शिक्षा करतो.